2010042719391700|

ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, पंचायत राज प्रशिक्षण केंद्र व संयुक्त प्रशिक्षण केंद्र यांच्या जीर्ण व मोडकळीस आलेल्या इमारतींची पाहणी करुन अहवाल देण्यासाठी समिती स्थापन करण्याबाबत....

**महाराष्ट्र शासन**
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्र. प्रशिक्षण २००९ प्र.क्र.१७४/योजना-४
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : १२ एप्रिल, २०१०

**प्रस्तावना :-**

ग्राम विकास विभागामार्फत राज्यात १ ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, ११ पंचायत राज प्रशिक्षण केंद्र व १ संयुक्त प्रशिक्षण केंद्र चालविण्यात येते. या प्रशिक्षण केंद्रांपैकी बहुतांशी प्रशिक्षण केंद्रांच्या इमारती जुन्या आहेत. ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, परभणी व पंचायतराज प्रशिक्षण केंद्र, मूल जि.चंद्रपूर या प्रशिक्षण केंद्रांनी मोडकळीस आलेल्या इमारतीची दुरुस्ती करणे आवश्यक असल्याचे व त्यासाठी निधी उपलब्ध करुन देण्याची शासनास विनंती केलेली आहे. बहुतांशी प्रशिक्षण केंद्रांच्या इमारती सन १९६४ पूर्वीच्या असून जुन्या झालेल्या आहेत असे वेळोवेळी घेतलेल्या प्राचार्यांच्या बैठकीत चर्चेमधून निदर्शनास आलेले आहे. त्यानुषंगाने कोणकोणत्या प्रशिक्षण केंद्रांच्या इमारती मोडकळीस आल्या आहेत किंवा त्यांची दुरुस्ती करणे आवश्यक आहे, प्रशिक्षण केंद्रांना कोणत्या पायाभूत सुविधांची आवश्यकता आहे, याची माहिती घेऊन त्यानुसार उपाययोजना करण्याची आवश्यकता आहे. याकरीता सर्व प्रशिक्षण केंद्रांची पाहणी करण्याकरीता व त्यासंदर्भात वस्तुनिष्ठ अभ्यास करुन शासनास अहवाल सादर करण्यासाठी समिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

वर प्रस्तावनेत नमूद केल्याप्रमाणे सर्व प्रशिक्षण केंद्रांची पाहणी करण्याकरीता व त्यासंदर्भात वस्तुनिष्ठ अभ्यास करुन शासनास अहवाल सादर करण्यासाठी खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १ | अध्यक्ष | **उपायुक्त ( विकास ), विभागीय आयुक्त कार्यालय, पुणे** |
| २ | सदस्य | **एक प्रतिनिधी, यशदा, पुणे** |
| ३ | सदस्य | **प्राचार्य, पंचायतराज प्रशिक्षण केंद्र,खामगांव,जि.बुलढाणा.** |
| ४ | सदस्य | **प्राचार्य, ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, परभणी , जि.परभणी .** |

२.		सदर समितीने प्रत्येक प्रशिक्षण केंद्रांची प्रत्यक्ष पाहणी करावी व पाहणीच्या दरम्यान प्रत्येक प्रशिक्षण केंद्रात सध्या काय सुविधा आहेत त्यांची यादी करावी. तसेच अद्ययावत प्रशिक्षण देण्याच्या दृष्टीने या प्रशिक्षण केंद्रात कोणत्या किमान पायाभुत सोयी सुविधांची आवश्यकता आहे तसेच स्त्री-पुरुष यांचेकरिता स्वतंत्र प्रसाधन गृहे आहेत काय, ग्रंथालये अद्ययावत आहेत काय, मनोरंजन कक्ष आहे काय याचीही यादी करावी. त्यासाठी अंदाजे किती रक्कम लागेल ते बाबनिहाय नमूद करावे. पाहणीच्या वेळी ज्या जिल्हयांमध्ये शासकीय ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र आहेत, त्या केंद्राच्या जवळपास किंवा महत्वाच्या ठिकाणी पटसंख्येअभावी शाळा बंद पडण्याच्या स्थितीत आहेत अशा जिल्हा परिषदांच्या प्राथमिक/माध्यमिक शाळांच्या इमारतींचीही पाहणी करावी. या इमारतींमध्ये मोठया प्रमाणात दुरुस्ती आवश्यक असलेली प्रशिक्षण केंद्रे स्थलांतरीत करता येवू शकतील. तेव्हा या इमारतींचा शासकीय ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्रांसाठी उपयोग करता येईल काय ही बाबही तपासून पहावी आणि तसा स्वयंस्पष्ट अहवाल शासनास सादर करावा.

३.		आवश्यकतेनुसार प्रशिक्षण केंद्राच्या इमारतींचे व्हिडीओ चित्रीकरण किंवा फोटो काढण्यात यावेत. यासाठी येणारा खर्च यशदा, पुणे या संस्थेमार्फत करण्यात यावा.

४.		वरील समितीस प्रशिक्षण केंद्रांच्या पहाणीसाठी जाण्याकरीता प्रशिक्षण केंद्रे असलेल्या जिल्हयाच्या जिल्हा परिषदांनी वेळोवेळी शासकीय वाहन उपलब्ध करुन दयावे.

५.		उपरोक्त समितीने परिच्छेद क्र.२ मध्ये नमूद केलेल्या बाबीसंदर्भात अभ्यास करुन शासन निर्णयाच्या दिनांकापासून चार महिन्याच्या आत शासनास अहवाल सादर करावा.

६.		सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

( संजय गांगुर्डे)
कार्यासन अधिकारी

प्रति,
१) विभागीय आयुक्त, आयुक्त कार्यालय ( सर्व )
२) महासंचालक, यशदा, बाणेर रोड, पुणे.
३) उपायुक्त, ( आस्था)/(विकास), आयुक्त कार्यालय ( सर्व )
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद ( सर्व )
५) उप सचिव ( आस्था), ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय,मुंबई
६) उप सचिव ( योजना), ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय,मुंबई
७) उपायुक्त (विकास) आयुक्त कार्यालय, पुणे.
८) एक प्रतिनिधी, यशदा, पुणे.
९) प्राचार्य, पंचायतराज प्रशिक्षण केंद्र, ( सर्व )
१०) प्राचार्य, ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र ( सर्व ), ११) प्राचार्य, संयुक्त प्रशिक्षण केंद्र
१२) निवड नस्ती, का.योजना-४.